**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रादेशिक ग्रामीण नळ पाणीपुरवठा योजनांना वितरीत करावयाच्या देखभाल-दुरुस्ती प्रोत्साहन अनुदानाबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.०१/पापु-१९**

७ वा माळा, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: २६ नोव्हेंबर, २०१८

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.०१/पापु-१९, दिनांक १९ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण पाणीपुरवठा क्षेत्रात सुधारणा करण्याच्या उद्देशाने व ग्रामीण जनतेस शुध्द व पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात सन २०१६-१७ ते २०१९-२० या कालावधीत मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्यात येत आहे. सदर कार्यक्रमांतर्गत प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीकरिता प्रत्येक वर्षी रु.१००.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. सदर निधी प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांना प्रोत्साहनपर अनुदानाच्या स्वरुपात वितरीत करण्याचा निर्णय संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१९ जानेवारी, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तथापि, जास्तीत जास्त प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांना प्रोत्साहन अनुदानाचा लाभ व्हावा व ग्रामस्थांना पाणीपट्टी भरण्यास प्रोत्साहन मिळावे याकरिता दि.१९ जानेवारी, २०१७ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१९ जानेवारी, २०१७ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत देखभाल दुरुस्ती प्रोत्साहन अनुदान वितरीत करावयाची सुधारित कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील.

२. राज्यातील ग्रामीण भागातील चालविण्यात येत असलेल्या सर्वच प्रादेशिक पाणीपुरवठा योजना (कायमस्वरुपी तसेच हंगामी) ह्या मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत देखभाल दुरुस्ती प्रोत्साहन अनुदान मिळण्यास पात्र राहतील. त्यानुसार प्रादेशिक पाणीपुरवठा योजना चालविणा-या संस्था/यंत्रणांना खालील सुत्रानुसार त्यांच्या पाणीपट्टी वसुलीच्या प्रमाणात देखभाल दुरुस्ती प्रोत्साहन अनुदान देय राहील.

**अ) गुरुत्व आधारित प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांकरिता:-**

| |
|---|
| प्रोत्साहन अनुदान= (सन २०१७-१८ वर्षातील देखभाल दुरुस्ती खर्च/२) X (सन २०१७-१८ वर्षातील एकूण पाणीपट्टी वसुली/ सन २०१७-१८ वर्षातील एकूण पाणीपट्टी आकारणी) |

**ब) विद्युत खर्च असलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांकरिता:-**

| |
|---|
| प्रोत्साहन अनुदान= (सन २०१७-१८ वर्षातील विद्युत खर्च) X (सन २०१७-१८ वर्षातील एकूण पाणीपट्टी वसुली/ सन २०१७-१८ वर्षातील एकूण पाणीपट्टी आकारणी) |

३. प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजनांना देखभाल-दुरुस्ती प्रोत्साहन अनुदान मिळण्याबाबतचे प्रस्ताव सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (मजीप्रा कडील योजनांच्या बाबतीत) व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (जिल्हा परिषद/शिखर समितीकडील योजनांच्या बाबतीत) यांचे स्तरावरुन संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना सादर करावेत.

४. देखभाल-दुरुस्ती प्रोत्साहन अनुदान हा पाणीपट्टी वसुलीला विकल्प/पर्याय नाही. त्यामुळे योजना आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टीची आकारणी करणे व आकारलेल्या पाणीपट्टीच्या जास्तीत जास्त वसूलीसाठी प्रयत्न करणे ही संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषदेची जबाबदारी राहील.

५. उपरोक्तप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणारे प्रोत्साहन अनुदान हे प्रादेशिक पाणीपुरवठा योजना चालविणा-या संस्था/यंत्रणांमार्फ़त सदर योजनेच्या देखभाल दुरुस्ती करिताच वापरण्यात यावे. सदर अनुदान ग्रामपंचायतीना वाटप करण्यात येऊ नये.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२६१२२५४०७६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.11.26 17:31:26 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
८) मुख्य /अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद (सर्व).
११) निवड नस्ती पापु-१९